प्रथम टप्प्यात राज्यातील पाच जिल्हा रोजगार
व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रामध्ये व्यवसाय
मार्गदर्शन व समुपदेशन केंद्र सुरु करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## रोजगार व स्वयंरोजगार विभाग
## शासन निर्णय क्रमांकः रोस्वरो-२०१४/प्र.क्र.१०९/रोस्वरो-१

जी.टी.हॉस्पीटल कॉम्प्लेक्स इमारत, ५ वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २१ ऑगस्ट,२०१४

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः रोजगार व स्वयंरोजगार विभाग, रोस्वरो-२०१२/प्र.क्र.३०९/रोस्वरो-१, दिनांक १९ मे,२०१४
२) संचालक, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक रोस्वसं/कक्ष-४/नियोजन/५७३१, दि.२९ मे,२०१४
३) शासन परिपत्रक ,वित्त विभाग, क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दिनांक १ जुलै,२०१४

## शासन निर्णय

या विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक १९ मे,२०१४ च्या शासन निर्णयान्वये राज्यात रोजगार व स्वयंरोजगार केंद्रांमध्ये व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्रे स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला असून पहिल्या टप्प्यात मुंबई उपनगर, औरंगाबाद, नागपूर, सांगली व सिंधुदुर्ग येथे अशी केंद्रे स्थापन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या केंद्रांसाठी येणारा खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्पीय तरतूद करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासाठी मागणी क्रमांक झेड-ए ०१, प्रधान लेखाशिर्ष २२३०- कामगार व सेवायोजन,०२-सेवायोजन सेवा,००१-सेवायोजन व प्रशासन या लेखाशिर्षाखाली “०६- व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्रांची स्थापना “ हे उपशिर्ष सुरु करण्यात आले आहे. सदरची केंद्रे कार्यान्वीत करण्याच्या अनुषंगाने पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध झालेला निधी वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील दिनांक १ जुलै,२०१४ च्या परिपत्रकातील तरतूदी विचारात घेता खालीलप्रमाणे वितरीत करण्यास तसेच वित्त विभागाने निधी खर्च करण्याबाबत वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना व वित्तीय अधिकारांचे पालन करुन खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

मागणी क्र.झेड ए-०१
प्रधान लेखाशिर्ष -२२३०- कामगार व सेवायोजन
०२- सेवायोजन सेवा, ००१- सेवायोजन व प्रशासन
०६- व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्रांची स्थापना ( २२३०६०३८)

| उद्दिष्ट | पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध निधी (रु.) | वित्त विभागाच्या दि.०१.०७.२०१४ च्या परिपत्रकान्वये खर्चास मान्यता दिलेला निधी (रु.) |
|---|---|---|
| दूरध्वनी, विज व पाणी | २७,८५,०००/- | १६,७१,०००/- |
| कार्यालयीन खर्च | ३,५०,८१,०००/- | २,१०,४८,६००/- |
| संगणक खर्च | १,१३,०८,०००/- | ६७,८४,८००/- |
| जाहिरात व प्रसिध्दी | ३१,००,०००/- | १८,६०,०००/- |
| व्यावसायीक शुल्क | १,४४,७९,०००/- | ८६,८७,४००/- |
| एकूण | ६,६७,५३,०००/- | ४,००,५१,८००/- |

२. राज्यात स्थापन करण्यात आलेल्या व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्रांसाठी वरीलप्रमाणे येणारा रु.४,००,५१,८००/- (रुपये चार कोटी एकावन्न हजार आठशे फक्त) खर्च वरील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व वर नमूद केलेल्याप्रमाणे मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२६४/१४७१, दिनांक २१.०७.२०१४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३४५/व्यय-५, दिनांक १५.०५.२०१४ व ३०.०७.२०१४ अन्वये दिलल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२११५५०५४९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Usha Prakash Mahajan

Digitally signed by Usha Prakash Mahajan
DN: c=IN, o=Govt of Maharashtra, ou=Employment and self employment, postalCode=400032, st=maharashtra, cn=Usha Prakash Mahajan
Date: 2014.08.22 11:51:13 +05'30'

उ.प्र.महाजन

शासनाच्या सह सचिव

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. कोषागार अधिकारी, ठाणे, औरंगाबाद, नागपूर, सांगली व सिंधुदुर्ग
७. उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९. आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, कोकण भवन, नवी मुंबई
१०. मा.मंत्री, रोजगार व स्वयंरोजगार यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
११. मा.राज्यमंत्री, रोजगार व स्वयंरोजगार यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
१२. प्रधान सचिव, रोजगार व स्वयंरोजगार यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई
१३. वित्त विभाग,व्यय-१५, मंत्रालय,मुंबई

१४. नियोजन विभाग, का-१४७१, मंत्रालय,मुंबई
१५. महाराष्ट्र कौशल्य विकास संस्था, मुंबई
१६. संचालक, यशदा पुणे
१७. निवड नस्ती